आरटीई अंतर्गत २५ % राखीव जागांवर प्रवेश देण्यात आलेल्या विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक शुल्काच्या प्रतिपूर्तीसाठी रू ३६/- कोटी इतका निधी उपलब्ध करून देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आरटीई-२०२१/प्र.क्र.१६९ /एस.डी-१**
चौथा मजला, विस्तार इमारत, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २३ फेब्रुवारी, २०२३

वाचा :-

१) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक:- अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ४.४.२०२२
२) वित्त विभागाचे अ.शा.पत्र क्रमांक:-अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३,दिनांक ५.४.२०२२
३) शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, पुणे-१ यांचे पत्र क्र.प्रशिसं/प्रतिपूर्ती/आरटीई-५२०/२०२२/८६०, दिनांक ७.३.२०२२
४. शालेय शिक्षण व क्रिडा विभाग,शासन निर्णय आरटीई २०२१/प्र.क्र.१६९/एसडी१ दि.२१.१०.२०२२
५) शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, पुणे-१ यांचे पत्र क्र.प्रशिसं/प्रतिपूर्ती /आरटीई-५२०/२०२२/५३३६, दिनांक १९.१२.२०२२

प्रस्तावना:-

बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील कलम-१२(१)(c) नुसार खाजगी विना- अनुदानित शाळांमध्ये प्रवेश स्तरावर संबंधीत वर्गातील विद्यार्थी संख्येच्या कमीत कमी २५ % जागा वंचित व दुर्बल घटकांतील मुलांसाठी राखीव ठेवण्याची तरतूद आहे. तसेच सदर अधिनियमातील कलम १२ (२) अन्वये आरटीई २५% प्रवेश देण्यात आलेल्या विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक शुल्काची प्रतिपूर्ती राज्य शासनामार्फत करण्याबाबतची तरतूद करण्यात आली आहे. यास्तव, शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी निधी उपलब्ध करून देण्याची विनंती उपरोक्त संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये शासनास केली आहे. सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षात विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक प्रतिपूर्तीसाठी रू.२०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला असून सदर निधीपैकी रू.८४ कोटी निधी शासन निर्णय दि.२१.१०.२०२२ अन्वये वितरित केला आहे.सद्यस्थितीत वित्त विभागाने रू. ३६ कोटी इतका निधी उपलब्ध करून दिला आहे.यास्तव, शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केलेल्या विनंतीस अनुसरून आरटीई २५% प्रवेश देण्यात आलेल्या विद्यार्थ्याच्या शैक्षणिक शुल्काची प्रतिपूर्तीसाठी ३६.००/- कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे..

शासन निर्णय-

बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम,२००९ मधील कलम -१२(१) (C) व कलम १२(२) अन्वये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने आरटीई २५% प्रवेश देण्यात आलेल्या विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक शुल्काची प्रतिपूर्ती करण्यासाठी रू.३६.००/- कोटी (रूपये छत्तीस कोटी फक्त) इतका निधी शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे सुपूर्द करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. शिक्षण संचालक(प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी जिल्ह्यांनी केलेल्या वाजवी मागणीच्या प्रमाणात निधी वितरीत करावा. वितरीत करण्यात आलेल्या निधीचा विनियोग केवळ प्रलंबित शैक्षणिक शुल्काची प्रतिपूती करण्याकरिता करावा.

३. प्रलंबित शैक्षणिक शुल्काची प्रतिपूर्ती करताना शासन परिपत्रक दिनांक २१.०८.२०१९ नुसार खालील बाबींची पडताळणी करून घ्यावी:-

१. बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ कायद्यांतर्गत ज्या शाळांनी कमीत कमी २५% जागांवर वंचित व दुर्बल घटकांतील बालकांना प्रवेश दिले आहेत, अशा शाळांनी इयत्ता १ ली ते इयत्ता ८ वी च्या विद्यार्थ्यासाठी आकारण्यात येणाऱ्या शैक्षणिक शुल्काचा तपशिल सरल या पोर्टलवर अथवा आरटीई पोर्टलवर जाहीर केलेला असावा. ज्या शाळांचे स्वत:चे संकेतस्थळ (Website) आहे, अशा शाळांनी शुल्काचा तपशिल संकेतस्थळावर देखील जाहीर केलेला असावा.

२. शाळेने शिक्षण हक्क अधिनियमांतर्गत आरटीई ची मान्यता प्राप्त असल्याबाबतचे प्रमाणपत्र सोबत जोडावे.

३. ज्या विद्यार्थ्यांना ऑनलाईन लॉटरी पध्दतीने यापूर्वी ज्या शाळेत प्रवेश मिळालेला आहे, असे विद्यार्थी संबंधित शाळेतच शिकत असल्याची खात्री सरल व आरटीई पोर्टल करून करावी.

४. सर्व विद्यार्थ्यांचे आधारकार्ड सरल पोर्टलवर नोंदविलेले असावे. केवळ आधार नोंदणीकृत विद्यार्थ्यांची संख्या ग्राह्य धरावी.

५. बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील कलम-१२ (२) मधील परंतुकात नमूद केल्यानुसार कोणतीही जमीन, इमारत, साधन सामग्री किंवा इतर सुविधा मोफत किंवा सवलतीच्या दरात प्राप्त झाल्याच्या कारणावरून ज्या शाळांना विशिष्ट संख्येतील बालकांना मोफत शिक्षण देण्याची अट घालण्यात आली असेल, अशा शाळा, बालकांच्या विशिष्ट संख्येच्या मर्यादेपर्यंत शैक्षणिक शुल्काच्या प्रतिपूर्तीसाठी हक्कदार असणार नाहीत.

४. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनार्थ मंजूर करण्यात आले आहे.त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३७/१४७१, दिनांक ०२.०२.२०२३ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५२/व्यय-५, दिनांक ०९.०२.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. वित्त विभागाच्या दिनांक ४.४.२०२२ च्या शासन परिपत्रकातील सर्व अटींची पूर्तता होत आहे.सदर अनुदान सशर्त अनुदान असून या शासन निर्णयात नमूद केलेल्या अटी व शर्ती त्यासाठी लागू असतील तसेच यापूर्वी वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे.

७. वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भ १ व २ येथील परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या सूचनांनुसार सदर प्रकरणी खर्च करावा. यासाठी शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे, शिक्षणाधिकारी (प्राथमिक),

सर्व जिल्हा परिषदा तसेच विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून तसेच आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना " नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी वितरणाचे उपयोगिता प्रमाणपत्र शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास सादर करावे.

८. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी प्राप्त झालेला निधी तात्काळ शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करावा. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचा निधी शिक्षणाधिकारी (प्राथमिक) यांचेकडे सुपूर्द करावा. जिल्हास्तरावरील प्रलंबित मागण्यांचा आढावा घेऊन ज्याप्रमाणे शैक्षणिक शुल्काची प्रतिपूर्ती शैक्षणिक संस्थांना करण्यात येईल, त्यानुसार त्यासंदर्भातील नोंदी केंद्र शासनाच्या प्रबंध पोर्टलवर नोंदवाव्यात.

९. सदर खर्च मागणी क्रमांक लेखाशीर्ष "मागणी क्रमांक ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०३-प्राथमिक शिक्षणासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांना सहाय्य, (०१) (१९) २५% विद्यार्थी कोटा प्रवेशांतर्गत शाळांना करावयाची प्रतिपूर्ती,(२२०२ H८७५), ३१ सहायक अनुदाने " या लेखाशिर्षाखालील सन २०२२-२३ या वित्तीय वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतुन भागविण्यात यावा.

१० सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२३१७२२०४७५२१ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SANTOSH
UMESHRAO
GAIKWAD

Digitally signed by SANTOSH UMESHRAO GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BC8833F9E213A7E4DFB9D2B071C9202EA52A04054E53B0C1BBF9E50C90A2CF5C, cn=SANTOSH UMESHRAO GAIKWAD
Date: 2023.02.23 17:27:25 +05'30'

**( संतोष गायकवाड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
३) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
५) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
८) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ६३
९) सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
१०) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
११) उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) वित्त विभाग, (व्यय-५ / अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१३) अवर सचिव/कक्ष अधिकारी, लेखा शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती (एस.डी.१).